नागपूर जिल्ह्यातील मौदा तालुक्यातील २ व कामठी तालुक्यातील ६ (इ.जि.मा./ग्रा.मा.) रस्ते प्र.जि.मा.म्हणुन दर्जोन्नत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१६/प्र.क्र.४५/नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १७ नोव्हेंबर, २०१६

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्रमांक. का. प्रआ/१८९०. दिनांक ०५/०४/२०१६
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे पत्र क्रमांक. का. प्रआ/३६७९. दिनांक ०२/०८ २०१६.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी संदर्भाधिन पत्रांन्वये नागपुर जिल्ह्यातील मौदा तालुक्यातील २ व कामठी तालुक्यातील ६ ग्रा.मा./इ.जि.मा. रस्ते प्र.जि.मा. म्हणुन दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या तसेच रस्त्यांचा एकुण होणारा वापर विचारात घेता सदर रस्ते प्रजिमा म्हणुन दर्जोन्नत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, नागपूर यांचा ठराव विचारात घेऊन नागपूर जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

**मौदा तालुका**

| अ.क्र. | रस्त्यांची नावे | साखळी क्रमांक | अंतर (कि.मी.) | पूर्वीच्या रस्त्यांचा क्रमांक | नव्याने दिलेला प्रजिमा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | रा.मा.३३९ पासून बापदेव इसापूर आजनगांव धानला प्रजिमा-२५ ला जोडणारा रस्ता. | ०/०० ते ११/५० | ११.५० | ग्रामा-१०६ (३ कि.मी.), ग्रामा-१११ (३.५ कि.मी.), ग्रामा-२५२ (५ कि.मी.) | ८५ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | मौदा रा. मा. ३३९ पासून राष्ट्रीय महामार्ग क्र. ६ ते वांजरा माहेखेडी वळना नांदगांव मोहाडी प्रजिमा - २५ ला जोडणारा रस्ता. | ०/०० ते १६/०० | १६.०० | इजिमा-२१४ (४ कि.मी.), इजिमा-२१७ (१ कि.मी.), इजिमा-२१८ (११ कि.मी.) | ८९ |

## कामठी तालुका

| अ.क्र. | रस्त्यांची नावे | साखळी क्रमांक | अंतर (कि.मी.) | पूर्वीचा रस्त्यांचा क्रमांक | नव्याने दिलेला प्रजिमा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | गादा रा.मा.३४१ ते शिरपूर पावनगांव कळमना रा.मा. ३४६ ला जोडणारा रस्ता. | ०/०० ते ११/५० | ११.५० | इजिमा-१७८ (८.५० कि.मी.), ग्रामा-५६ (३.०० कि.मी.) | ३३ (पूर्वीच्या प्रजिमामध्ये लांबी समाविष्ठ) |
| २. | खरबी पासून तरोडी (खु) तरोडी (बु) दिघोरी (खु) केत शिवनी प्रजिमा-४२ ला जोडणारा रस्ता | ०/०० ते १७.५० | १७.५० | ग्रामा-२०० (२.५० कि.मी.), ग्रामा-१९७ (४.०० कि.मी.), ग्रामा-१७२ (४.५० कि.मी.), ग्रामा-१६२ (३.०० कि.मी.), ग्रामा-६९ (३.५० कि.मी.) | ७५ |
| ३. | चिखली प्रजिमा-११ पासून भुगांव केसोरी भामेवाडा ते प्रजिमा-३३ ला जोडणारा रस्ता | ०/०० ते १६.५० | १६.५० | इजिमा-१८५ (४.०० कि.मी.), ग्रामा-१२६ (४.०० कि.मी.), ग्रामा-११७ (३.५० कि.मी.), ग्रामा-११६ (३.०० कि.मी.), ग्रामा-१०७ (२.०० कि.मी.) | ७९ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४. | लिहीगांव (प्रजिमा-३४) पासून कढोली रा.मा.क्र.६ ते सावळी उमरी वडोदा ते असलवाडा प्रजिमा-४५ ला जोडणारा रस्ता | ०/०० ते १८/०० | १८.०० | इजिमा-१८२ (३.०० कि.मी.), ग्रामा-१५५ (४.०० कि.मी.), ग्रामा-१४६ (७.०० कि.मी.), ग्रामा-१३६ (१.०० कि.मी.), इजिमा-१८७ (३.०० कि.मी.) | ७८ |
| ५. | प्रजिमा-४० पासून धारगांव कापसी (बु) आसोली दिघोरी ते अडका प्रजिमा-४२ ला जोडणारा रस्ता | ०/०० ते १२/५० | १२.५० | ग्रामा-७३ (५.०० कि.मी.), ग्रामा-१६९ (४.५०कि.मी.), ग्रामा-१६३ (३.०० कि.मी.) | ८२ |
| ६. | (अजनी) रा.मा.३४१ पासून लिहीगांव रा.म.मा.६ महालगांव ते दिघोरी (खु) प्रजिमा ४५ ला जोडणारा रस्ता | ०/०० ते १४/५० | १४.५० | ग्रामा-७५ (५ कि.मी.), ग्रामा-५१ (१.५ कि.मी.), ग्रामा-८१ (५ कि.मी.), इजिमा-१८१ (३.०० कि.मी.). | ८३ |

असे एकूण ८ इजिमा/ग्रामा रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत. सदर रस्त्यांची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती केल्यास रस्ते विकास योजना २००१-२१ मधील नागपूर जिल्ह्यात **प्रमुख जिल्हा मार्ग** लांबीत **११८.००** कि. मी. ने वाढ होवून एकूण लांबी (२२९४.८३ + ११८) म्हणजे **२४१२.८३ कि. मी.** इतकी होईल. इतर जिल्हा मार्गाच्या जिल्ह्याच्या लांबीत ३७.५० कि. मी. ने घट होऊन एकूण लांबी ( २२७१.३६ -३७.५०) म्हणजे २२३३.८६ कि. मी. इतकी होईल. तसेच ग्रामीण मार्गाच्या एकूण लांबीत ८०.५० किमीने घट होऊन एकूण लांबी (७८७१.१४- ८०.५०) म्हणजे ७७९१.६४ कि.मी. इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१६१११७१७१०१९९३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2016.11.17 17:12:33 +05'30'

( प्रशांत पाटील )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नागपूर. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
३) जिल्हाधिकारी, नागपूर.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, नागपूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
६) कार्यकारी अभियंता, विशेष प्रकल्प सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
९) निवडनस्ती.